**मुख्यमंत्री ग्रामसडक योजना**
**नाबार्ड अर्थ सहाय्यासाठी नविन लेखाशिर्ष निर्माण करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुग्रायो २०१६/प्र.क्र. ४५७/पं.रा.-७**
**बांधकाम भवन, ७ वा मजला, २५ मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई ४००००१**
**तारीख: २३ नोव्हेंबर,२०१६**

**वाचा -**

१) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांकः ग्रासयो२०१५/ प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८ ऑक्टोबर,२०१५.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई यांचे पत्र क्र.ख.वि./चा-१/ग्रा.वि.वि.ज.स.वि./यू ओ आर-७८/२०१६-१७/१३२१, दि.१८ऑक्टोबर, २०१६

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्यातील न जोडलेल्या वाडया-वस्त्या जोडण्यासाठी व ग्रामीण भागातील दुरावस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी राज्यात मुख्यमंत्री ग्रामसडक योजना दि.२८/१०/२०१६ रोजीच्या धोरणात्मक निर्णयानुसार सुरु करण्यात आली आहे.सदर धोरणात्मक निर्णयानुसार या योजनेअंतर्गत दर्जोन्नतीचा फायदा मिळणार आहे त्या गावातील स्वेच्छेने मिळणारा १५ टक्के निधी, आदिवासी विकास विभागाकडून व नाबार्ड व तत्सम बँकेतून कर्जाच्या स्वरुपात निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्याअनुषंगाने नाबार्ड कडून अर्थसहाय्य उपलब्ध करुन घेण्यासाठी या योजनेसाठी निर्माण केलेल्या लेखाशिर्षाखाली स्वतंत्र उपशिर्ष निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

१. मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी नाबार्ड कडून अर्थ सहाय्य उपलबध करुन घेणेसाठी पुढीलप्रमाणे उपशिर्ष निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| मराठीत लेखाशिर्ष | इंग्रजीत लेखाशिर्ष |
|---|---|
| मागणी क्र. एल-०७ | Demand No L-07 |
| ५०५४ मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च | 5054 Capital Outlay on Roads and Bridges |
| ०४ जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग | 04 Districts and Other Rural Roads |
| ३३७ रस्त्यांची कामे | 337 Road Works |
| (०१) नाबार्ड अंतर्गत अर्थसहाय्य | (01) Financial Assistance under NABARD |
| (०१) (०१) नाबार्डच्या कर्ज सहाय्यातून कार्यान्वित केलेली कामे | (01)(01) Works executed through Loan Assistance from NABARD. |
| ५३ मोठी बांधकामे | 53 Major works |
| सी.आर.सी.-५०५४५२०६ | CRC -50545206 |

२. सदरचा शासन निर्णय महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई यांच्या संदर्भांकित क्र. २ च्या पत्रान्वये तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १९४/१४४४, दि.१८/८/२०१६ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०६/अर्थ-१७/१०, दि.१६/११/२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२३११४०४१६८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2016.11.23 15:40:20 +05'30'

**(दि.बा.पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर

२. सचिव, मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन,मुंबई
३. मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
४. उप सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन,मुंबई
५. सर्व अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो)
६. सर्व कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो)
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखाधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७) मंत्रालय,मुंबई
११.नियोजन विभाग (कार्यासन १४१४), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
१२.कार्यासन अधिकारी (आस्थापना/रोख शाखा/वित्त-१/योजना-८), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
१३. निवड नस्ती (पं.रा.-७), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.